**दक्षता पथक कार्यालयास उपअभियंता (विद्युत) या संवर्गातील ३ पदे उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१६/प्र.क्र.२९१/२०१६/आ.(प्रशि)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २४ ऑगस्ट, २०१७.

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
२) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१२/६८/(४७/२०१२)/दक्षता-१, दिनांक १३/०३/२०१२.
३) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, संकीर्ण-००१६/प्र.क्र.४८३/२०१६/मोप्र-१, दिनांक २५/०७/२०१६.
४) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१२/प्र.क्र.६८/(४७/२०१२)/दक्षता-१, दिनांक २१/१०/२०१६.
५) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१६/प्र.क्र.२९१/२०१६/ आ.(प्रशि), दिनांक २९/११/२०१६.
६) शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग, आढावा-२०१७/प्र.क्र.९४-अ/२०१७/आ.(प्रशि), दिनांक ०४/०८/२०१७.

प्रस्तावना-

सिंचन विषयक विशेष चौकशी समितीच्या अहवालातील प्रस्तावित ४२ सुधारणांच्या अंमलबजावणीसाठी अ.क्र.३ च्या शासन निर्णयान्वये ५ दक्षता पथकांकडील तसेच ४ परिमंडळीय कार्यालयांकडील कामकाज हाताळण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या १४५ पदांच्या आकृतीबंधात २० अतिरिक्त पदे मंजूर करुन एकूण १६५ पदांचा सुधारीत आकृतीबंध अ.क्र.४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधानुसार ५ दक्षता पथक कार्यालयांकरिता उप अभियंता (स्थापत्य) संवर्गातील प्रत्येकी ५, उप अभियंता (यांत्रिकी) संवर्गातील प्रत्येकी १ व उप अभियंता (विद्युत) संवर्गातील प्रत्येकी १ असे एकूण ३५ पदांचा मापदंड निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार ५ दक्षता पथक कार्यालयांकरिता उप अभियंता (यांत्रिकी) संवर्गातील प्रत्येकी १ अशी एकूण ५ पदे मंजूर करणे आवश्यक आहे.

तथापि, अ.क्र.६ च्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अधिनस्त कोयना (विवयां) संकल्पचित्र मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयाच्या नियंत्रणाखाली कार्यरत कोयना (विवयां) संकल्पचित्र विभाग क्र.३, पुणे हे विभागीय कार्यालय बंद करण्यात आले आहे. बंद करण्यात आलेल्या कार्यालयांकडील उपअभियंता (यांत्रिकी) या संवर्गातील ३ मंजूर पदे दक्षता पथक कार्यालयास फिरवाफिरवीने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

अ.क्र.६ येथील शासन निर्णयान्वये बंद करण्यात आलेल्या कोयना (विवयां) संकल्पचित्र विभाग क्र.३, पुणे या कार्यालयाकडील उपअभियंता (विद्युत) या संवर्गातील ३ मंजूर पदे खालील नमूद दक्षता पथक कार्यालयास उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पद उपलब्ध करुन द्यावयाच्या कार्यालयाचे नांव |
|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे |
| २ | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, पुणे |
| ३ | अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, नागपूर |

२. तसेच अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, औरंगाबाद व अमरावती या कार्यालयांकरिता उपअभियंता (विद्युत) या संवर्गातील प्रत्येकी १ अशी २ पदे व उपअभियंता (स्थापत्य) व (यांत्रिकी) या संवर्गातील निश्चित करण्यात आलेल्या मापदंडानुसार ५ दक्षता पथक कार्यालयांसाठी प्रत्येकी १ अशी १० पदे उपलब्ध करुन द्यावयाची असून सदर कार्यवाही पदांच्या उपलब्धतेनुसार करण्यात येईल.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२४१६२१४५७५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.08.24 16:12:11 +05'30'

**(वि. का. चौधरी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा.
७) मा. विधान परिषद/ विधानसभा सदस्य (सर्व).
८) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य अभियंता (विद्युत), जलसंपदा विभाग, मुंबई.
१७) सह सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१९) उप सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे/पुणे/औरंगाबाद/नागपूर/अमरावती.
२२) अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई. (जलसंपदा विभागाच्या HRMS-WRD या संकेतस्थळावर व ई-सेवापुस्तकात आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२३) अधीक्षक अभियंता, कोयना (विवयां) संकल्पचित्र मंडळ, पुणे.
२४) सर्व अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.